जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत मौजे दुधाळे (ता.जि.नंदुरबार) या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु- २०२२/प्र.क्र.२३०/पापु-१८
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख: २५ फेब्रुवारी, २०२२.

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१३
२) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४
३) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक १६ फ़ेब्रुवारी, २०१५
४) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५ जून, २०१५
५) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो-२०१८/प्र.क्र.१७१/पापु-०७, दिनांक ११ फेब्रुवारी, २०१९.
६) शासन निर्णय क्रमांक जजमि-२०१९/प्र.क्र.१३८/पापु-१० (०७), दिनांक ०४ सप्टेंबर, २०२०.
७) शासन निर्णय क्रमांक जजमि-२०१९/प्र.क्र.१३८ (भाग-२)/पापु-१०, दिनांक १० मार्च, २०२१.
८) शासन निर्णय क्रमांक जेजेएम-२०२१/प्र.क्र.११५/पापु-१०, दिनांक २० ऑक्टोबर, २०२१.
९) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र जा.क्र.मुअ/ नाशिक/तांशा-३/४७२/२०२२, दिनांक ०५.०२.२०२२.

प्रस्तावना

मौजे दुधाळे (ता. जि. नंदुरबार) नळ पाणी पुरवठा योजनेचा दरडोई खर्च हा विहीत निकषापेक्षा जास्त आहे. तसेच योजनेची किंमत रू. ५.०० कोटीपेक्षा जास्त असल्यामुळे सदर नळ पाणी पुरवठा योजनेस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भ क्रमांक ०९ अन्वये शासनाच्या मान्यतेकरीता सादर केला आहे. प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावास मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. तसेच सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या अध्यक्षतेखाली तांत्रिक छाननी समितीच्या दिनांक २१ जानेवारी, २०२२ रोजीच्या बैठकीत मंजुरी देण्यात आलेली आहे. त्यामुळे मौजे दुधाळे (ता. जि.नंदुरबार ) ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.१५५४.१२ लक्ष (ढोबळ) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मौजे दुधाळे (ता.जि. नंदुरबार) येथील ५५ लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या रु. ५५००/- इतका दरडोई खर्च असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. १५५४.१२ लक्ष (अक्षरी रूपये पंधरा कोटी चोपन्न लक्ष बारा हजार फक्त ) इतक्या ढोबळ

किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत खालील अटी व शर्तींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत करण्यात यावी. योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर ती संबंधित कार्यकारी अभियंता यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे या आशयाची सुचना मिळाल्यानंतरच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधित ग्रामपंचायत जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण/जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतीचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

२) योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर किमान १ वर्षे योजना चालविणे कंत्राटदारावर बंधनकारक राहील. योजना यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे याची खात्री महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने करावी, तसेच योजनेच्या देखभाल दुरुस्तीसाठी संदर्भाधीन क्र. २ येथील दि.१७ ऑक्टोबर, २०१४ रोजीच्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचा अवलंब करावा.

३) संदर्भ क्रमांक ०७ येथील दिनांक १० मार्च, २०२१ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीचा अवलंब करावा.

४) योजनेची अंमलबजावणी होऊन कंत्राटदारा मार्फत योजना किमान १ वर्ष चालविण्यात येणार असली तरी ग्रामस्थांकडून या एक वर्षाचीही पाणीपट्टी वसूल करण्यात यावी. वसूल करण्यात आलेली पाणीपट्टी योजना चालविणाऱ्या संस्थेस देण्यात यावी.

५) **संदर्भ क्र. ६ येथील दिनांक ४ सप्टेंबर, २०२० रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार व केंद्र शासनाच्या जल जीवन मिशनच्या मार्गदर्शक तत्वानुसार पाणी पुरवठा योजनेच्या देखभाल दुरुस्ती करिता योजनेच्या किंमतीच्या १० टक्के रक्कम लोकवर्गणीच्या स्वरुपात ग्रामपंचायतीकडे ठेवणे आवश्यक राहील. सदर रक्कम जमा करुन घेण्याची जबाबदारी ग्रामपंचायत व जिल्हा परिषदेची राहिल.**

६) **सदर योजनेतून प्रत्येक घरास नळ जोडणी देणे आवश्यक आहे. यादृष्टीने आतापर्यंत दिलेल्या नळ जोडणी व पूढे देण्याच्या नळ जोडणीबाबत IMIS वर माहिती नोंदविणे आवश्यक आहे. नवीन जोडणीबाबत आवश्यक ते नियोजन करण्याची जबाबदारी ग्रामपंचायतीची राहील.**

७) योजनेची कामे विहीत पध्दतीने ई- निविदा मागविण्यात येऊन करावीत.

८) योजनेसाठी आवश्यक भुसंपादन व इतर सर्व परवानग्या विहित वेळेत प्राप्त करुन घेण्यात याव्यात.

९) सदरील प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेचा वापर हंगामी स्वरूपात होऊ नये याकरीता योजनेत समाविष्ट गावातील अस्तित्वातील योजना चालविण्यात येणार नाही याची हमी ग्रामपंचायतीकडून घेण्यात यावी.

१०) योजना चालविणे व देखभाल दुरूस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधित ग्रामपंचायतीने योजनेच्या अंमलबजावणीसाठी प्रस्तावामध्ये नमूद केल्यानुसार घरगुती, बिगर घरगुती व संस्थात्मक नळजोडणी धारकासाठी पाणी पट्टीचा दर निश्चित करावा व त्यात

कालपरत्वे वाढ करण्यात यावी. तसेच योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी निश्चित करणे ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील. याबाबत संबंधित अंमलबजावणी यंत्रणेच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना स्पष्टपणे सविस्तर माहिती द्यावी.

११) योजना चालविणे त्याचे परिरक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस / जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

१२) सदर योजनेतील गाव हागणदारी मुक्त असले तरी ते नेहमीच हागणदारी मुक्त राहिल याबाबत खात्री करावी.

१३) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून जादा अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

१४) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची पुर्तता करण्यात यावी. तसेच संदर्भाधीन क्र. १ ते ८ येथील शासन निर्णयातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

१५) शासनामार्फत योजनेच्या त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाबाबत वेळोवेळी निर्गमित करण्यात येणाऱ्या शासन निर्णयानुसार योजनेचे त्रयस्थ तांत्रिक परिक्षण करणे अनिवार्य राहील.

१६) योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी निश्चित करणे व त्यात आवश्यकतेनुसार वाढ करणे ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील. याबाबत जिल्हा परिषद /महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना स्पष्टपणे सविस्तर माहिती द्यावी.

१७) योजनेची अंमलबजावणी पुर्ण झाल्यानंतर संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने योजना पुर्णत्वाचा दाखला सक्षम प्राधिकाऱ्याकडे सादर करणे बंधनकारक राहील.

१८) योजनेच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.

१९) **जल जीवन मिशन अंतर्गत ग्रामीण पाणीपुरवठा योजनांकरिता विहित केलेली मानके पूर्ण करणे बंधनकारक राहील.**

२०) योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेच्या पुर्णत्वाचे दाखले संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून प्राप्त करुन घेवून शासनास सादर करण्याची जबाबदारी राज्य पाणी व स्वच्छता मिशन (SWSM), बेलापूर यांची राहील.

२१) जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत घरगुती नळ जोडणीच्या कार्यात्मकतेबाबत विभागाच्या दिनांक २०.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार उचित कार्यवाही करण्यात यावी.

२२) कार्यारंभ आदेश देण्यापूर्वी आवश्यकता असल्यास राज्य स्तरीय योजना मंजुरी समितीची मान्यता मिळाल्याची खात्री संबंधित मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांनी करावी.

२३) तांत्रिक छाननी उप समितीने उपस्थित केलेल्या मुद्यांची पुर्तता करण्याची जबाबदारी संबंधित मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांची राहील.

२. या योजनेवर होणारा खर्च मागणी क्र. वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, जल जीवन मिशन कार्यक्रम (केंद्र हिस्सा) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ९७९१) (२२१५ ९८४४) (२२१५ ९८५३), जल जीवन मिशन कार्यक्रम (राज्य हिस्सा) (२२१५ २०७१) (२२१५ ए०९७) (२२१५ ए०६१) या लेखाशिर्षाखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२३१९३५३०५६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA GORAKH BHARATE

Digitally signed by RAVINDRA GORAKH BHARATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, pseudonym=70D3D439CAAEA9606F4BC7818EBB80F4CAED8330, serialNumber=FD232EB47EB633CB760C7BD2ACF421B01B1DA040DC965254760018B5F4E33BE5, cn=RAVINDRA GORAKH BHARATE
Date: 2022.02.28 15:08:49 +05'30'

**(डॉ.रविंद्र भराटे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.अध्यक्ष, विधानसभा/मा.सभापती विधान परिषद/मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद.
२. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
५. महालेखापाल,महाराष्ट्र-२,नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
६. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग,
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. जिल्हाधिकारी, नंदुरबार.
९. आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, नंदुरबार.
११.मिशन संचालक,राज्य पाणी व स्वच्छता मिशन,सिडको भवन,बेलापूर
१२.मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक.
१३.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नंदुरबार.

१४.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१५.मुख्य अभियंता तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुबई.
१६. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग कार्यासन पापु-०४ .
१७. निवडनस्ती पापु-१८, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई-०१